**मराठी भाषा भवन, मुख्य केंद्र, चर्नी मार्ग, मुंबई व मराठी भाषा भवन, उपकेंद्र, ऐरोली, नवी मुंबई यांच्या जागा व इमारतीच्या मालमत्ता कराचा भरणा करण्याकरिता नवीन लेखाशीर्ष निर्माण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्र. मभाभ-२०२२/प्र.क्र.१४/भाषा-१ (दुय्यम नस्ती)**
८ वा मजला, नवीन प्रशासन भवन,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दि. ०६ जून, २०२३.

**प्रस्तावना :-**

मराठी भाषा भवन, उपकेंद्र ही इमारत भूखंड क्र.६ ए, सेक्टर-१३, ऐरोली, नवी मुंबई येथे उभारण्यात येणार आहे. सदर भूखंडाचा ताबा दि.१६.०७.२०२१ रोजी सिडको महामंडळाकडून मराठी भाषा विभागास प्राप्त झाला आहे. सदर भूखंडाकरीता नवी मुंबई महानगरपालिकेकडून मालमत्ता कराची भरणा करण्याबाबत देयक प्राप्त झाले होते. सदर मालमत्ता कराची भरणा करण्याची बाब ही नियमित खर्चाची असल्याने मराठी भाषा विभागाच्या वतीने प्रतिवर्षी प्राप्त होणाऱ्या मालमत्ता कराचे देयक अदा करण्याकरिता विभागाकडे सुयोग्य लेखाशिर्ष उपलब्ध नसल्याने नवीन लेखाशीर्ष घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मराठी भाषा विभागाच्या वतीने भूखंड क्र.१७३६, चर्नी रोड, मुंबई व भूखंड क्र.६ ए, सेक्टर-१३, ऐरोली, नवी मुंबई येथे अनुक्रमे मराठी भाषा भवन, मुख्य केंद्र, मुंबई व मराठी भाषा भवन, उपकेंद्र, ऐरोली, नवी मुंबई या इमारतीच्या प्रतिवर्षी प्राप्त होणाऱ्या मालमत्ता कराचे देयक अदा करण्याकरिता खालीलप्रमाणे नवीन लेखाशीर्ष निर्माण करण्यात येत आहे,

| | **मराठी लेखाशीर्ष** | **इंग्रजी लेखाशीर्ष** |
|---|---|---|
| मागणी क्रमांक | झेडएफ- ०१ | ZF-01 |
| मुख्य लेखाशीर्ष | २०५२, सचिवालयीन सर्वसाधारण सेवा | 2052- SECRETARIAT- GENERAL SERVICES |
| उप मुख्य लेखाशीर्ष | ००- सचिवालयीन सर्वसाधारण सेवा | 00- Secretariat- General Services |
| गौण शीर्ष | ०९०- सचिवालय | 090- Secretariat |
| गट शीर्ष | ०० | 00 |
| उप गटशीर्ष (योजनेचे नाव) | (००) (०५) मराठी भाषा भवन (अनिवार्य) (२०५२ ५४०१) | (00) (05) Marathi Bhasha Bhavan (Committed) (2052 5401) |
| तपशीलवार शीर्ष | १४- भाडेपट्टी व कर | 14- Rent, Rate and Taxes |

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनौसं १४९/ अर्थ-१४, दि.१५.०२.२०२३, अनौसं २५७/व्यय-४, दि.०४.०५.२०२३ व मा.महालेखापाल कार्यालयाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक सं.ख.वि/चा-१/मराठी भाषा विभाग/ युओआर-१९७/२०२२-२३/४७, दि.१८.०४.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६०६११०९०३८५३३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MARUTI LAXMAN LHAYAKAR

Digitally signed by MARUTI LAXMAN LHAYAKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, 2.5.4.20=8b602cc35713bc737e58d3d44ef592bf297a5d88ada3a0b76b51280ec6081313, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=48E018A56D88390B5D52CAF1AC6184FB1588E15FEBCF18C68DECE92BF667529B, cn=MARUTI LAXMAN LHAYAKAR
Date: 2023.06.06 11:09:13 +05'30'

**( मा. ल. ल्हायकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, मराठी भाषा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
३. महालेखापाल, महाराष्ट्र -२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
४.अपर मुख्य सचिव, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी (पूर्व), मुंबई -९३,
६. मुख्य अभियंता,महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ,अंधेरी (पूर्व), मुंबई -९३,
७. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, विभाग क्र.१, ठाणे व विभाग क्र.२, महापे,
८. उप सचिव, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
९. अवर सचिव (अर्थसंकल्प/ भाषा-१), मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१२. कक्ष अधिकारी (रोखशाखा), मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. निवडनस्ती (भाषा-१).